“खाजगी वाहतुकदारांकडून घेण्यात येणाऱ्या वाहनांच्या दरकरारास मुदतवाढ देण्याबाबत...”

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

**शासन निर्णय क्रमांक :-शापसे-२०१४/प्र.क्र. २४२/का. ३१,**

सचिवालय जिमखाना, १ ला मजला, मंत्रालयासमोर,

मुंबई-४०० ०३२.

**दिनांक : ६ डिसेंबर, २०१४.**

**वाचा : १)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.:शापसे-१०१२/प्र.क्र.२/का.३१, दिनांक- ३/११/२०१२.

**२)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शापसे-२०१४/प्र.क्र.२४२/का.३१, दि. २८.१०.२०१४.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचेकडून अति अति महत्वाचे मान्यवर व मा. राज्य अतिथींच्या परिवहन व्यवस्थेसाठी, पुरेशी शासकीय डी. व्ही. वाहने उपलब्ध नसताना, खाजगी पुरवठादारांकडून भाडेतत्वावर वाहने पुरविण्यासाठी दि. ०२/११/२०१२ ते ०१/११/२०१४ या कालावधीसाठी मंजूरी देण्यात आली होती. सदर मंजूरी दि. २ नोव्हेंबर, २०१४ रोजी संपुष्टात आल्यामुळे, खाजगी वाहन पुरवठादारांबरोबर नवीन दरकरार करण्याबाबतची ई-निविदा प्रक्रिया/कार्यवाही सुरु आहे. सदर कार्यवाही पूर्ण होण्यासाठी आणखी काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. यास्तव पुरेशा डी. व्ही. वाहनांअभावी मान्यवरांच्या परिवहन व्यवस्थेमध्ये अडचणी निर्माण होऊ नयेत म्हणून दिनांक ३ नोव्हेंबर, २०१२ च्या शासन निर्णयास संदर्भाधिन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये, दि. ३०.११.२०१४ पर्यंत पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यामुळे आता संदर्भाधिन क्र. १ अन्वये मंजूरी दिलेल्या दरकरारास पुन्हा मुदत वाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयाने अति अति महत्वाचे मान्यवर व मा. राज्य अतिथींच्या परिवहन व्यवस्थेसाठी, पुरेशी शासकीय डी. व्ही. वाहने उपलब्ध नसताना, खाजगी पुरवठादारांकडून भाडेतत्वावर वाहने पुरविण्यासाठी, खाजगी पुरवठादारांची नव्याने नियुक्ती करण्यासाठी व नवीन दरकरार करण्यासाठी सुरु केलेली ई-निविदा प्रक्रिया/कार्यवाही पार पाडून दरकरारास शासनाची मंजूरी मिळण्यास काही कालावधी लागेल हे विचारात घेऊन आता शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.:शापसे-१०१२/प्र.क्र.२/३१, दिनांक ३ नोव्हेंबर, २०१२ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या दरकरारास संदर्भाधिन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये, दि. ३०.११.२०१४ पर्यंत किंवा नविन दरकरार निश्चित होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्याता आली होती. आता **सदर दरकरारास दि. ३१.०३.२०१५ पर्यंत किंवा नविन दरकरार निश्चित होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत शासनाची मान्यता देण्यात येत आहे.**

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१४१२०६११५४३४९४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MORE ARVIND B

Digitally signed by MORE ARVIND B
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MORE ARVIND B
Date: 2014.12.06 12:02:09 +05'30'

**(अ.भि.मोरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१.संचालक, शासकीय परिवहन सेवा, सर पसेचखानवाला मार्ग, वरळी सी-फेस, वरळी, मुंबई - ४०० ०३०,
२. महालेखापाल (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
३. उप सचिव व उप राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, शिबिर कार्यालय, पहिला माळा, सचिवालय जिमखाना, मुंबई - ४०० ०३२,
४. उप सचिव/(राजशिष्टाचार)/का. ३१, सामान्य प्रशासन विभाग, शिबिर कार्यालय, पहिला माळा, सचिवालय जिमखाना, मुंबई - ४०० ०३२,
५. उप सचिव, व्यय-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
६. उप सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
७. उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
८. परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय, बांद्रा (पूर्व), मुंबई,
९. अवर सचिव (राजशिष्टाचार)/का.३०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
१०.अवर सचिव(शा.प.से.)/का.३१, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, सर पसेचखानवाला मार्ग, वरळी सी-फेस, वरळी, मुंबई - ४०० ०३०,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, यांचे स्वीय सहायक.
१४. निवडनस्ती/का.३१